**मराठवाडा पॅकेज अंतर्गत जालना जिल्ह्यात २० शेळ्या + ०२ बोकड असा शेळी गट वाटप करणे ही पथदर्शी योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- पुरक २०२४ प्र.क्र.०९/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक ,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :- २७ जून, २०२४

**वाचा :-** १.कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२३८/पदुम-४, दि.१५.१०.२०१६.
२. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२३८/पदुम-४, दि.१५.१०.२०१७.
३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२३८/पदुम-४, दि.०९.०७.२०२१.

**प्रस्तावना:-**

मराठवाडा पॅकेज अंतर्गत जालना जिल्ह्यात २० शेळ्या + ०२ बोकड असा शेळी गट वाटपाच्या पथदर्शी योजनेस वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. वाचा क्र.२ येथील दि.१५.१०.२०१७ च्या शुध्दीपत्रकान्वये या योजनेंतर्गत सर्व प्रवर्गातील लाभार्थ्यांना ५० टक्के बॅक एन्डेड अनुदान देय असून, गट स्थापनेच्या पहिल्या वर्षी पहिल्या सहा महिन्यात २५ टक्के व उर्वरित २५ टक्के अनुदान दुसऱ्या सहा महिन्यात थेट लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच, वाचा क्र. ३ येथील दि. ०९.०७.२०२१ च्या शासन निर्णयान्वये योजनेंतर्गत वाटप करावयाच्या शेळी गटाच्या किंमतीत सुधारणा करण्यात आली असून, सुधारित दर सन २०२१-२२ पासून लागू करण्यात आले आहेत.

जालना जिल्ह्यात एकुण १,००० लाभार्थ्यांना या योजनेंतर्गत लाभ द्यावयाचा असून, सन २०२२-२३ पर्यंत ४४९ लाभार्थ्यांना लाभ देण्यात आला आहे. उर्वरित ५५१ लाभार्थ्यांना अद्यापही या योजनेंतर्गत लाभ द्यावयाचा आहे. सदरची वस्तूस्थिती विचारात घेता, सदर योजना सन २०२४-२५ व २०२५-२६ या कालावधीत योजनेच्या मुळ १,००० गट वाटपाच्या लक्षांकाच्या मर्यादेत राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मराठवाडा पॅकेज अंतर्गत जालना जिल्ह्यात २० शेळ्या + ०२ बोकड असा शेळी गट ५० टक्के बॅक एन्डेड अनुदान तत्वावर वाटपाच्या पथदर्शी योजनेस सन २०२४-२५ व २०२५-२६ या वर्षासाठी योजनेच्या मुळ १,००० गट वाटपाच्या लक्षांकाच्या मर्यादेत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदरची योजना राबविण्यासाठी या विभागाचा शासन निर्णय दि. १५.१०.२०१६, शासन शुध्दीपत्रक दि.१५.१०.२०१७ व शासन निर्णय दि. ०९.०७.२०२१ अन्वये विहीत केलेल्या तरतुदी जसेच्या तशा लागू राहतील.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२६ /का.१४३१, दि. १३.०६.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४२७ / व्यय-२ दि.२०.०६.२०२४ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेताक २०२४०६२७१००६०३६००१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.06.27 10:17:03 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना
३. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर
४. जिल्हाधिकारी, जालना
५. प्रधान महालेखापाल (लेखा परिक्षा)- १/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर
७. व्यवस्थापकिय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे
८. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
९. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, जालना
११.जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, जालना
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
१३.अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती (पदुम-४).